**औद्योगिक सुरक्षा व आरोग्य संचालनालयात कार्यरत असणाऱ्या प्रमाणक शल्य चिकित्सक यांना ६ व्या वेतन आयोगातील व्यवसायरोध भत्ता मंजूर करण्याबाबत.**

**महाराष्ट्र शासन**
**उद्योग, उर्जा व कामगार विभाग,**
**शासन निर्णय क्र. औसुवआ-०७११/प्र.क्र.३७/कामगार-१**
मंत्रालय, मुंबई ४०००३२.
दिनांक : २६ नोव्हेंबर, २०१८

**वाचा** : वित्त विभाग, शासन अधिसूचना, क्र. : वेपुर १०१६/प्र.क्र.६९/सुधारणा-८२/सेवा-९, दि.२४.११.२०१६.

**शासन निर्णय** :

औद्योगिक सुरक्षा व आरोग्य संचालनालयात प्रमाणक शल्य चिकित्सक, गट-अ या पदावर कार्यरत असणाऱ्या अधिकाऱ्यांना सहाव्या वेतन आयोगानुसार सुधारीत दराने व्यवसायरोध भत्ता मंजूर करण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती. आता शासनाने प्रमाणक शल्य चिकित्सक, गट-अ यांना सहाव्या वेतन आयोगातील वेतन श्रेणीनुसार मूळ वेतनाच्या ३५% व्यवसायरोध भत्ता मंजूर करण्याचा निर्णय घेतला आहे. परंतू, त्यांना मिळणारे एकूण वेतन अधिक व्यवसायरोध भत्ता यांची एकत्रित रक्कम दरमहा रु.८५०००/- पेक्षा जास्त नसावी.

२. सदर व्यवसायरोध भत्ता दि.१ जुलै, २०१२ पासून प्रत्यक्षात अदा करण्यात आलेल्या वेतनावर लागू होईल.

३. औद्योगिक सुरक्षा व आरोग्य संचालनालयातील प्रमाणक शल्य चिकित्सक, गट-अ यांना व्यवसायरोध भत्ता अनुज्ञेय करण्यात आला आहे. प्रमाणक शल्य चिकित्सकास कोणत्याही प्रकारे खाजगी, स्वतंत्र व्यवसाय करता येणार नाही व तसे आढळल्यास तो नियमानुसार कारवाईस पात्र राहील. सदर तरतुदीची अंमलबजावणी व संनियंत्रण करण्याची खालील कार्यपध्दती/ यंत्रणा विहित करण्यात येत आहे.

३.१) व्यवसायरोध भत्ता लागू केला असल्यामुळे प्रमाणक शल्य चिकित्सकास व्यवसायरोध भत्ता न घेण्याबाबतचा विकल्प देता येणार नाही.

३.२) व्यवसायरोध भत्ता अनुज्ञेय असल्यामुळे प्रमाणक शल्य चिकित्सकास स्वत:च्या नावे रुग्णालय, दवाखाना चालविता येणार नाही किंवा नोंदणी करता येणार नाही. अन्य खाजगी रुग्णालयात किंवा दवाखान्यात जावून आरोग्य सेवा देता येणार नाही. प्रमाणक शल्य चिकित्सक अशा प्रकारे खाजगी व्यवसाय करीत असल्याचे आढळून आल्यास प्रमाणक शल्य चिकित्सक जबर शिक्षेस पात्र राहील. शिक्षा कालावधीत व्यवसायरोध भत्ता अनुज्ञेय असणार नाही.

३.३) व्यवसायरोध भत्ता अनुज्ञेय असल्यामुळे प्रमाणक शल्य चिकित्सकाची कोणत्याही रुग्णालयात/ दवाखान्यात कोणत्याही प्रकारची प्रत्यक्ष व अप्रत्यक्ष भागीदारी असता कामा नये.

३.४) प्रमाणक शल्य चिकित्सक खाजगी व्यवसाय करीत नाहीत याची खात्री करुन संचालक, औद्योगिक सुरक्षा व आरोग्य संचालनालय, मुंबई यांनी नियंत्रण अधिकारी या नात्याने दरमहा तसे प्रमाणित करणे बंधनकारक राहील.

३.५) प्रमाणक शल्य चिकित्सक कार्यरत असलेल्या कार्यालयाच्या दर्शनी भागात "येथे काम करणाऱ्या प्रमाणक शल्य चिकित्सकांना व्यवसयरोध भत्ता अनुज्ञेय असल्याने खाजगी वैद्यकीय व्यवसाय करण्यास प्रतिबंध करण्यात आला आहे" असा फलक लावण्यात यावा.

३.६) प्रमाणक शल्य चिकित्सक यांना व्यवसायरोध भत्ता अनुज्ञेय असल्यामुळे त्यांना खाजगी व्यवसाय करण्यास प्रतिबंध असल्याची माहिती शासकीय संकेत स्थळावर प्रसिध्द करण्यात यावी.

३.७) प्रमाणक शल्य चिकित्सकाने आयकर विभागास सादर केलेल्या आयकर विषयक विवरणपत्राची (Income Tax return) प्रत माहितीसाठी संचालकास सादर करावी.

३.८) प्रशिक्षण कालावधी दरम्यान प्रमाणक शल्य चिकित्सकास व्यवसायरोध भत्ता अनुज्ञेय असणार नाही.

४. व्यवसायरोध भत्ता हा निवृत्तीवेतनाच्या परिगणनेसाठी आणि शासकीय निवासस्थानासाठी आकारण्यात येणाऱ्या सेवा शुल्काच्या परिगणनेसाठी विचारात घेण्यात यावा. या व्यतिरिक्त प्रवास भत्ता, दैनिक भत्ता, घरभाडे भत्ता, शहर भत्ता वेतन निश्चिती इत्यादींसाठी व्यवसायरोध भत्ता हिशोबात धरण्यात येऊ नये. प्रमाणक शल्य चिकित्सकास निवृत्तीनंतर खाजगी वैद्यक व्यवसाय करण्यास बंधन नसल्यामुळे, निवृत्तीनंतर निवृत्तीवेतनात व्यवसायरोध भत्त्याचा समावेश असणार नाही.

५. ज्या लेखाशीर्षाखाली प्रमाणक शल्य चिकित्सकाच्या वेतन व भत्यापोटी येणारा खर्च, खर्ची टाकण्यात येतो, त्याच लेखाशीर्षाखाली व्यवसायरोध भत्याच्या पोटी येणारा खर्च देखील खर्ची टाकण्यात यावा व मंजूर अनुदानातून भागविण्यात यावा.

६. या आदेशान्वये अनुज्ञेय असलेला व्यवसारोध भत्ता मूळ वेतनाशी निगडीत असल्याने शासनाच्या स्थायी आदेशानुसार ज्या कालावधीकरिता मुळ वेतन अदा केले जात नाही अशा कालावधीसाठी व्यवसायरोध भत्ता अनुज्ञेय असणार नाही.

७. सदर शासन निर्णय वित्त विभागाच्या अनौपचारीक संदर्भ क्रमांक १२०/सेवा-५ दि.२६.१०.२०१८ अन्वये मिळविलेल्या सहमतीने निर्गमित करण्यात येत आहे.

८. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०१८११२६१७१८००७९१० असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

Meghashyam Nawar

Digitally signed by Meghashyam Nawar
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=Industries,Energy and Labour Department, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=7d2d0d7e2120f3814eff2bd1a5d3c902860ebecbe995c3b2260a01b762f45c3a, serialNumber=a5505efe2f8776471817f30ce3446f37d84d8aeddd35d8e3a76a12d1b08434dd, cn=Meghashyam Nawar
Date: 2018.11.26 17:22:14 +05'30'

**(मेघ:श्याम नवार)**
कार्यासन अधिकारी, महाराष्ट्र शासन

**प्रति,**

१. प्रभारी संचालक, औद्योगिक सुरक्षा व आरोग्य संचालनालय, मुंबई,
२. महालेखापाल, महाराष्ट्र १, (लेखापरीक्षा)/ (लेखा व अनुज्ञेयता), महाराष्ट्र राज्य, मुंबई,
३. संचालक, लेखा व कोषागार, मुंबई,
४. अधिदान व लेखाधिकारी, मुंबई,
५. निवड नस्ती, (कामगार-१).